राज्यातील न्यायालयांकरीता पायाभूत सुविधा निर्माण करणे, त्यात वाढ करणे व त्या अंमलात आणणे याकरीता राज्यस्तरीय समिती स्थापन करणे.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांक : व्हीआयपी-३८२२/प्र.क्र.१८७/का-१३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०२ जून, २०२३

**वाचा :-** मा.केंद्रीय मंत्री, विधि व न्याय मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र.एन-१७/३८/२०१६-एनएम, दिनांक निरंक चे पत्र

**प्रस्तावना :-**

भारतातील न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने "न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे" ही केंद्र पुरस्कृत योजना सर्व राज्यांमध्ये सन १९९३-९४ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत राज्यातील न्यायालयांच्या नवीन इमारतींचे बांधकाम, मा.न्यायाधीशांकरीता निवासस्थानांची बांधकामे व न्यायालयांकरीता इतर अनुषंगिक बांधकामाकरीता निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदर योजनेसाठी केंद्र व राज्य यांच्याकडून ६०:४० या प्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्याचे प्रावधान आहे. सदर विषयाच्या अनुषंगाने मा.केंद्रीय मंत्री, विधि व न्याय मंत्रालय, नवी दिल्ली यांना उपरोक्त संदर्भाधिन पत्रामध्ये नमूद केले आहे की, भारतातील सर्व मा. मुख्यमंत्री व मा.मुख्य न्यायमुर्ती यांची परिषद दिनांक ३० एप्रिल २०२२ रोजी विज्ञान भवन, नवी दिल्ली येथे आयोजित करण्यात आली होती. सदर परिषदेमध्ये न्यायालयांकरीता पायाभूत सुविधा निर्माण करणे, त्यात वाढ करणे व त्या अंमलात आणणे याकरीता राज्य शासन व उच्च न्यायालय यांनी समन्वयाने काम करण्याची आवश्यकता आहे. त्याकरीता राज्यस्तरावर मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रतिनिधी व मा.मुख्य न्यायमुर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या प्रतिनिधींचा समावेश असलेली समिती स्थापन करण्यात यावी असे ठरले होते. त्यानुसार राज्यस्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**राज्यातील न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे.**

| अ.क्र. | समिती |
|---|---|
| १ | मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रतिनिधी |
| २ | मा.मुख्य न्यायमुर्ती, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे प्रतिनिधी |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई |
| ४ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई |
| ५ | प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई |

| | |
|---|---|
| ६ | मा.प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई |
| ७ | सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई |
| ८ | सह/उप सचिव (का-१३) विधि व न्याय विभाग - सदस्य सचिव |

२. राज्यातील न्यायालयांकरीता पायाभूत सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने विविध बाबींसदर्भात राज्य शासन व मा.उच्च न्यायालय यांनी समन्वयाने कार्य करणे हा समितीचा उद्देश असेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६०२१७३३०००५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.06.02 17:34:33 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**

**विधि सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा.महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई
८) मा.प्रबंधक (निरीक्षणे-२), अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सह सचिव-नि-विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग (सर्व)
१७) संग्रहार्थ /निवड नस्ती कार्या-१३.